**मांडवी नदीच्या खो-यामध्ये कर्नाटक शासनाने प्रस्तावित केलेल्या प्रकल्पाविरुध्द गोवा शासनाने सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या दाव्याबाबत मांडवी पाण तंटा लवाद समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्र.मांडवी २०१०/२३४/(१०५/२०१०)/जसंनि,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- २८.०९.२०१०

**प्रस्तावना**-

मांडवी नदीच्या खो-यामध्ये कर्नाटक शासनाने प्रस्तावित केलेल्या प्रकल्पाविरुध्द गोवा शासनाने सर्वोच्च न्यायालयात दावा क्र.४/०६ दाखल केलेला आहे. यानुसार गोवा सरकार वादी (Plaintiff) असून कर्नाटक सरकार प्रतिवादी क्र.१(Defendant No.1) केंद्र सरकार प्रतिवादी क्र.२(Defendant No.2) महाराष्ट्र सरकार प्रतिवादी क्र.३ (Defendant No.3) आहेत.

विर्डी प्रकल्प हा मांडवी खो-यात येतो. सदर प्रकल्प हा कट्टीका नाल्यावर असून हा नाला महाराष्ट्रातच उमग पावून महाराष्ष्ट्रातच हलतर नाल्यास मिळतो. हलतर नाल्याची महाराष्ट्राच्या वाटयाची जलसंपत्ती ५२.१३९ द.ल.घ.मी. असून त्यापैकी १४.६३४ द.ल.घ.मी.पाणी विर्डी प्रकल्पाद्वारे अडविण्यात येणार आहे. संपूर्ण मांडवी खो-यात महाराष्ट्राच्या वाटयाला येणा-या १२० द.ल.घ.मी.पाण्यापैकी १४.६३४ द.ल.घ.मी.(१२.२०टक्के) पाणी विर्डी प्रकल्पाद्वारे वापरात येणार आहे. मांडवी खो-यात उपलब्ध होणा-या संपूर्ण जलसंपत्तीचा अभ्यास करुन महाराष्ट्राच्या वाटयाला येणारी जलसंपत्ती निश्चित करुन त्याचा वापर करण्यासाठी प्रकल्प निश्चित करणे व त्याचे विविध वापर यासाठी मांडवी खो-याचा आराखडा (Master Plan) तयार करुन पाणी वापर लवादासाठी सादर करणे आवश्यक असल्याने मांडवी तंटा लवाद समिती स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

मांडवी खो-यात उपलब्ध होणा-या संपूर्ण जलसंपत्तीचा अभ्यास करुन महाराष्ट्राच्या वाटयाला येणारी जलसंपत्ती निश्चित करणे व त्याचा वापर करण्यासाठी आराखडा तयार करणे तसेच पाणी वापर लवादासाठी सादर करण्यासाठी खालीलप्रमाणे मांडवी तंटा लवाद समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे. | अध्यक्ष |
| २. | मुख्य अभियंता, (द व प्र) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ३. | मुख्य अभियंता (ज.सं.) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ४. | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई | सदस्य. |
| ५. | अधीक्षक अभियंता, कोकण पाटबंधारे मंडळ, कुवारबांव, रत्नागिरी | सदस्य |
| ६. | कार्यकारी अभियंता, पाटबंधारे प्रकल्प, बांधकाम विभाग, कुवारबांव, रत्नागिरी. | सदस्य |
| ७. | कार्यकारी अभियंता, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ. ठाणे | समन्वय अधिकारी व सदस्य सचिव |

या समितीकडे मांडवी खो-याचा आराखडा (Master Plan) व तयार करण्यासाठी नेमलेल्या सल्लागारांना/वकीलांना विविध माहिती देणे व आराखडा तयार करण्याबाबतची सर्व कार्यवाही पूर्ण करणे, अशा प्रकारची कामे राहतील.

तसेच अधीक्षक अभियंता, कोकण पाटबंधारे मंडळ, कुवारबांव, रत्नागिरी आणि कार्यकारी अभियंता, पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, कुवारबांव, रत्नागिरी हे क्षेत्रीय अधिकारी सर्वेक्षण, संकल्पन, नियोजन आदि खोरे आराखडा तयार करण्यासाठी सर्व कामे करण्यासाठी नियुक्त करण्यात येत आहेत. त्यांनी मांडवी तंटा लवाद समितीपुढे सर्व माहिती सादर करावी.

मांडवी तंटा लवाद समितीच्या बैठका महिन्यातून एकदा अथवा आवश्यकतेनुसार अधिकवेळा घेण्यात याव्यात. समितीने आपला अहवाल तीन महिन्यात शासनास सादर करावा.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००९२८१९२४१३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(ना.लो.गवळे)
मुख्य अभियंता (जसं) व सहसचिव

१. मा.मंत्री जलसंपदा (कृष्णा खोरे पाटबंधारे महामंडळ वगळून) व ऊर्जा यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री जलसंपदा, (कृष्णा खोरे पाटबंधारे महामंडळ), यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई.
३. सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंध्ारे विकास महामंडळ, ठाणे.
६. मुख्य अभियंता (द व प्र ) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. मुख्य अभियंता (जसं) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
९. उप सचिव (जसं), जलसंपदा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
१०. अधीक्षक अभियंता, कोकण पाटबंधारे मंडळ, कुवारबांव, रत्नागिरी
११. कार्यकारी अभियंता, पाटबंधारे प्रकल्प, बांधकाम विभाग, कुवारबांव, रत्नागिरी.
१२. कार्यकारी अभियंता, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ.ठाणे
१३. जसंनि कार्यासन संग्रहार्थ.